**राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत संरक्षित शेती हा प्रकल्प सन २०१५-१६ मध्ये राबविण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी ,पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : राकृवियो-२०१५/प्र.क्र.२७६ /९-अे**
**मादाम कामा रोड,हुतात्मा राजगुरु चौक**
**मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक : २६ ऑक्टोबर,२०१५**

**वाचा:-** शासन पत्र कृषी ,पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
क्र. RKV-0415/C.R.38/RKVY CELL, Dated 25th June 2015.

**प्रस्तावना :-**

मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे अध्यक्षतेखालील दि. १८ जून, २०१५ रोजी झालेल्या राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीच्या (SLSC) २० व्या बैठकीत सन २०१५-१६ मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत संरक्षित शेती प्रकल्प ही योजना राज्यात राबविण्यास मंजूरी देण्यात आली आहे.

संरक्षित शेती अंतर्गत हरीतगृह व शेडनेटगृह या बाबींचा समावेश असून या घटकाव्दारे कमी जागेत व कमी पाण्यात अधिक दर्जेदार व निर्यातक्षम फुले व भाजीपाला पिकांचे उत्पादन घेणे शेतकऱ्यांना शक्य होते. संरक्षित शेतीस राज्यातील शेतकऱ्यांचा वाढता प्रतिसाद लक्षात घेता राष्ट्रीय कृषी विकास योजनेअंतर्गत संरक्षित शेतीसाठी रु. २५.०० कोटी रकमेचा प्रकल्प राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. तद्नुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे:-

**शासन निर्णय :-**

१. सन २०१५-१६ मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत संरक्षित शेती हा रु.२५.०० कोटी रकमेचा प्रकल्प राज्यात राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.
२. सदर प्रकल्प राज्यातील सर्व जिल्ह्यांमध्ये राबविण्यात येईल.
३. सदर प्रकल्पाचे भौतीक व आर्थिक लक्षांक खालील प्रमाणे आहे.

| अ.क्र. | घटक | भौतीक लक्षांक | आर्थिक लक्षांक (रु.लाखात) |
|---|---|---|---|
| १. | हरीत गृह | २५० | १२५०.०० |
| २. | शेडनेटगृह | ४५० | १२५०.०० |
| | एकूण | ७०० | २५०० |

४. मंजूर निधीपैकी केंद्र शासनाचा हिस्सा ५० टक्के व राज्य शासनाचा हिस्सा ५० टक्के राहिल.
५. प्रस्तुत प्रकल्प राबविण्याकरीता निधी वितरणाची कार्यवाही राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष, कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई यांच्याकडून करण्यात येईल.
६. प्रकल्पाची अंमलबजावणी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे सनियंत्रणाखाली कृषि विभागामार्फत करण्यात यावी.

७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांनी, केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनानुसार या योजनेचा आर्थिक व भौतिक प्रगती अहवाल विहित मुदतीत केंद्र शासनाला तसेच राज्य शासनाला सादर होईल याची दक्षता घेण्यात यावी.

८. सदर प्रकल्प एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान (MIDH) अंतर्गत संरक्षित शेती या घटकाकरीता लागू होणा-या मार्गदर्शक सूचनानुसार राबविण्यात यावा. संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांनी त्याबाबतच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे प्रकल्प अंमलबजावणी करावी.

९. राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत संरक्षित शेती प्रकल्पासाठी उपलब्ध होणारा रू.२५.०० कोटी इतका निधी सन २०१५-१६ या चालू वित्तिय वर्षात अखर्चित राहणार नाही याची काळजी अंमलबजावणी यंत्रणांनी घ्यावी.

१०.योजनेतील निधी खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांनी राकृवियो कक्ष, कृषी व पदुम विभाग,मंत्रालय यास वेळोवेळी सादर करण्याची कार्यवाही करावी.

११.सदर शासन निर्णयाची काटेकोरपणे अमंलबजावणी होईल याची दक्षता आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी. या योजनेसाठी खर्च करताना सर्व वित्तीय नियम, विनियम, शासन निर्णय, अधिसूचना, आदेश, केंद्र शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले आदेश, केंद्रीय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचना आणि भारताचे नियत्रंक व महालेखापरिक्षक यांचे या संदर्भातील निरिक्षण यांचे पालन होईल या अटीच्या अधिन राहून निधी खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१२.सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०२७१५४८३६६१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Vitthal Vishe

Digitally signed by Anil Vitthal Vishe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=74ca9dc2061da0ad3bea01df9e4b7d481e5cbddd04fda84d597e4e31691e5e7f, cn=Anil Vitthal Vishe
Date: 2015.10.27 15:51:35 +05'30'

**(अनिल वि.विशे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन,

**प्रति,**

१. मा. मंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२
२. मा.राज्यमंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२
३. मा.अपर मुख्य सचिव, (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय, मुंबई -३२
४. आयुक्त कृषी, महाराष्ट्र राज्य,पुणे.
५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे
६. सर्व संचालक कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे,

७. सर्व विभागीय कृषी सहसंचालक,
८. सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी,
९. सहाय्यक संचालक (लेखा) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता ) (लेखा परीक्षा ) मुंबई /नागपूर,
११. संचालक, लेखा व कोषागार, मुंबई ( २ प्रती)
१२. सहसंचालक लेखा व कोषागारे, संगणक कक्ष,नवीन प्रशासन भवन, ५वा मजला, मुंबई -३२,
१३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१५. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
१६. लेखाधिकारी, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे
१७. माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
१८. राकृवियो कक्ष,कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१९. निवड नस्ती/९-अे